**धनोली ल.पा.प्रकल्प, ता.कळवण, जि.नाशिक या प्रकल्पाच्या रु.२१.६७ कोटीच्या किंमतीस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा-२०१४/(४४/२०१४)/लपा-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १२/०६/२०२३

**पहावे** :- (१) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे जा.क्र.कासं/तापाविम/ प्रशा-९/ धनोली/३५२/सन-२०१४, दि.२०/०१/२०१४ चे पत्र.
(२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे जा.क्र.कासं/तापाविम/प्रशा-२/ /४७३८/सन-२०२१, दि.२६/१०/२०२१ चे पत्र.
(३) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे जा.क्र.कासं/तापाविम/प्रशा-२/ /५११८/सन-२०२२, दि.१४/१२/२०२२ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

धनोली ल.पा.प्रकल्प, तापी पाटबंधारे विकास महामंडळातील तापी खोऱ्यातील गिरणा उपखोऱ्यात नाशिक जिल्हातील कळवण तालुक्यातील धनोली गावानजीक सापुतारा नदीवर आहे. मुख्य धरणाचे काम सन २००६ मध्ये पूर्ण झाले असून सद्य:स्थितीत मुख्य धरण व डावा कालवा व्यवस्थापनेसाठी मालेगाव पाटबंधारे विभाग, मालेगाव यांचेकडे हस्तांतरीत करण्यात आला आहे. या योजनेअंतर्गत धनोली मुख्य धरण, उजवा कालवा १८ किमी व डावा कालवा १४.३० किमी लांबीचे असून कालव्याची कामे सन २००७ मध्ये पूर्ण करण्यात आली आहेत. धनोली डावा तट कालवा अंतर्गत ७०२ हे.क्षेत्रास सिंचनाचा लाभ होत असून उजवा कालव्यातर्गत ८९२ हे सिंचन क्षेत्र आहे. डावा तट कालव्यामुळे कळवण तालुक्यातील मौजे धनोली. भापखेडा, शेपूपाडा, जिरवाडे, भांडणे, दळवट, शिंगाशी, वेरुळे, या गावांची ७०२ हे. क्षेत्र सिंचनाखाली येत असून उजवा तट कालव्याअंतर्गत मौजे धनोली, शेपुपाडा, श्रुंगारवाडी, तताणे, दरेगाव, जामले, कोसुर्डे, भाकुर्डे, करंभेळ (क). करंभेळ(अ) या गावांचे ८९२ हे. क्षेत्र सिंचनाखाली येत आहे. अशाप्रकारे धरणाची एकूण साठवण क्षमता ४.९१४ दलघमी असून एकुण सिंचन क्षेत्र १५९४ हे. आहे

शासन निर्णय क्र.डीनल/१०८४/३१(२२/८४)जसंभ दि.१८/०४/१९८४ अन्वये दरसूची सन १९८३-८४ नुसार रू.१२.१५ कोटी इतक्या किंमतीस मुळ प्रशासकीय मान्यता आहे. शासन निर्णय क्र.लपायो १४९९/३४/९, दि.१०/०१/२००० अन्वये दरसूची सन १९९६-९७ नुसार रू.१७.६२ कोटी इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता आहे.

राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांच्या दि.०२/०२/२०२१ रोजी संपन्न झालेल्या १५५ व्या बैठकीत रु.२१.६७ कोटी (दरसूची सन २०१८-१९) इतक्या किंमतीच्या व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाच्या मुल्यार्पण अहवालास सहमती प्राप्त आहे.

प्रकल्प किंमतीत वाढीची कारणे (रु.कोटी)

| **अ.क्र.** | **बाब** | **मंजूर प्रथम सुप्रमाच्या तुलनेत** | | **एकूण वाढीच्या तुलनेत वाढीची टक्केवारी** |
|---|---|---|---|---|
| | | **वाढ** | **टक्केवारी** | |
| १ | भूसंपादन किंमतीत वाढ | ३.८७ | २१.९६% | ९५.५६% |
| २ | इतर कारणे | ०.१६ | ०.९१% | ३.९५% |
| ३ | अनुषंगिक खर्चातील वाढ | ०.०२ | ०.११% | ०.४९% |
| | **एकुण:** | **४.०५** | **२२.९९%** | **१००%** |

सदर प्रकल्प लाभव्यय गुणोत्तर व पाणी साठ्याची प्रति सघमी किंमतीच्या मापदंडात बसतो. तथापि, सदर प्रकल्प आर्थिक परतावा दराच्या मापदंडात बसत नाही. म्हणून नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने सदर प्रकल्प

व्यय अग्रक्रम समितीच्या निर्णयार्थ सादर केला होता. त्यानुसार व्यय अग्रक्रम समितीने दिनांक १३ जानेवारी, २०२३ रोजी झालेल्या बैठकीत या प्रकल्पास मान्यता प्रदान केली आहे. सदर मान्यतेनुसार व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

धनोली ल.पा.प्रकल्प, ता.कळवण, जि.नाशिक, या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१८-१९ वर आधारित रु.२१.६७ कोटी (एकवीस कोटी, सदुसष्ट लक्ष फक्त) इतक्या किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु.१८.१८ कोटी व अनुषंगीक खर्च रू.३.४९ कोटी) खालील अटींच्या अधीन राहून व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) संपूर्ण प्रकल्प हा प्रस्तावित व्दितीय सु.प्र.मा.किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्याची जबाबदारी/हमी महामंडळाची राहील.
२) सदर प्रकल्पाच्या व्दितीय सु प्र मा प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.
३) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील. या संदर्भात महामंडळाने प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील.
४) सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपद्धतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना शासनाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही व अशी कोणतीही सहमती / मान्यता शासनाने प्रस्तुत प्रकल्पाबाबत दिलेली नाही.
५) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही.
६) व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.
७) सदर प्रकल्पावर लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र.आय-५ प्रधान लेखाशिर्ष,"४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०) सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका(००),(००)(०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान,(लहान पाटबंधारे) (कार्यक्रम),५४-गुंतवणुका (४७०२ ४९२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७०/२०२२/कार्यासन १४३४ , दिनांक १९/१०/२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२५/२०२२/कार्यासन व्यय-१२, दिनांक २८/१०/२०२२ अन्वये प्राप्त सहमतीने तसेच दिनांक १३/०१/२०२३ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीतील मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आला आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय/सुधारीत मान्यता नोंदवहीत २५८ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०६१२१८२३२३८३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.06.12 18:24:10 +05'30'

**( अमोल फुंदे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्ष नेते, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१४. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१५. जिल्हाधिकारी, नाशिक.
१६. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१८. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे.
२०. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई.
२१. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२२. अर्थ शाखा -१ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. ल.पा. कार्यासन (संग्रहार्थ).

**परिशिष्ट-अ**

**धनोली ल.पा.प्रकल्प, ता.कळवण, जि.नाशिक या प्रकल्पास व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.**

**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा-२०१४/(४४/२०१४)/लपा-१ चे परिशिष्ट**

**उपशिर्षनिहाय तरतूदी**

**(किंमत रू. कोटी)**

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर सुप्रमा किंमत (दरसूची १९९६-९७) | प्रस्तावित द्वितीय सुप्रमा किंमत (दरसूची २०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|---|
| **१. शीर्षकामे** | | | | |
| १ | अ-प्राथमिक | ०.०२ | ०.०२ | ०.०० |
| २ | ब-भूसंपादन | ०.३७ | ०.३७ | ०.०० |
| ३ | क-बांधकाम | ३.४५ | ३.४५ | ०.०० |
| ४ | ड-विमोचक | ०.५४ | ०.५४ | ०.०० |
| ५ | के-इमारती | ०.०९ | ०.०९ | ०.०० |
| ६ | "एम" वृक्षारोपण | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| ७ | ओ-संकिर्ण | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| ८ | पी- देखभाल | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| ९ | "क्यु" हत्यारे व अवजारे | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| १० | आर- दळणवळण | ०.०९ | ०.०९ | ०.०० |
| ११ | उन्नेयी बंधारा | ०.१६ | ०.१६ | ०.०० |
| | एकूण (अ): | ४.७६ | ४.७६ | ०.०० |
| **(ब) कालवा** | | | | |
| १ | अ- प्राथमिक | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| २ | ब- भूसंपादन | ०.०५ | ३.९२ | ३.८७ |
| ३ | डी- विमोचके | ०.२७ | ०.२७ | ०.०० |
| ४ | ई-फॉल | ०.४२ | ०.४२ | ०.०० |
| ५ | एफ-सी.डी.वर्क्स | ६.२२ | ६.१८ | -०.०४ |
| ६ | जी-पुल | ०.६४ | ०.६४ | ०.०० |
| ७ | एच-एस्केप | ०.०७ | ०.०७ | ०.०० |
| ८ | के- इमारती | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| ९ | एल-मातीकाम | १.२९ | १.२९ | ०.०० |
| १० | एम-वृक्षारोपण | ०.०१ | ०.०१ | ०.०० |
| ११ | ओ- संकिर्ण | ०.०३ | ०.०३ | ०.०० |
| १२ | पी- देखभाल | ०.०४ | ०.२४ | ०.२० |
| १३ | आर- दळणवळण | ०.०२ | ०.०२ | ०.०० |
| १४ | वितरीका | ०.३१ | ०.३१ | ०.०० |
| | एकूण (ब): | ९.३९ | १३.४२ | ४.०३ |
| I | एकूण (अ+ब) | १४.१५ | १८.१८ | ४.०३ |
| II | अनुषंगिक खर्च | ३.४७ | ३.४९ | ०.०२ |
| | **एकूण ( I + II )** | **१७.६२** | **२१.६७** | **४.०५** |

<u>मापदंड</u>

| अ. क्र. | निकष | मंजूर प्रथम सुप्रमा किंमती नुसार | प्रस्तावित द्वितीय सुप्रमा किंमती नुसार | मापदंड | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | लाभव्यय गुणोत्तर | १.२७ | १.३४ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| २ | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.३५८५१/- | रु. ४४०७१/- | रु.१४०५३३/- प्रती सघमी | प्रकल्प मापदंडात बसतो |
| ३ | आर्थिक परतावा | १२.१८ | ७.९७% | १२%पेक्षा जास्त. | प्रकल्प मापदंडात बसत नाही |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.06.12 18:24:24 +05'30'

**(अमोल फुंदे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन